**मुंबई शहर भूमापन व भूमी अभिलेख विभागातील ४२ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक अस्थायी-२०२४/प्र.क्र.४५/ई-७**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

वाचा :-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१००४/प्र.क्र.८८/ल-१, दिनांक २८.०३.२००६.

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.अस्थायी-२०२३/प्र.क्र.१९२/ई-७, दिनांक २०.१०.२०२३.

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक २१.०२.२०२४.

४) जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचे पत्र क्र.आस्था/कार्या-३/सीएसएलआर/मुदतवाढ/२०२३/२३२, दिनांक १५.०२.२०२४.

**शासन निर्णय :-**

महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१००४/प्र.क्र.८८/ल-१, दि.२८.०३.२००६ अन्वये जिल्हाधिकारी, मुंबई शहर भूमापन व भूमि अभिलेख विभागातील पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. तसेच महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.अस्थायी-२०२३/प्र.क्र.१९२/ई-७, दि.२९.१०.२०२३ अन्वये जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या आस्थापनेवरील मुंबई शहर भूमापन व भूमि अभिलेख शाखेतील ४२ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

२. आता संदर्भाधीन क्र.३ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.२१.०२.२०२४ अन्वये सर्व प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील मंजूर पदांचा आढावा घेऊन आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार सर्व प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले असून, सदर अधिकारात खालील ४२ अस्थायी पदांना, या पदांपैकी एकही पद सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त नव्हते वा व्यपगत झालेले नाही, तसेच कमी करण्यात आलेले नाही या अटीच्या अधिन राहून दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहायक संचालक नगर रचना | ०१ |
| २ | सहायक अधिक्षक क्र.१ व २ | ०२ |
| ३ | सहायक लेखा अधिकारी | ०१ |
| ४ | परिरक्षण भूमापक | ११ |

| | | |
|---|---|---|
| ५ | वरिष्ठ आरेखक व आरेखक | ०७ |
| ६ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | ०१ |
| ७ | वरिष्ठ लिपिक | ०२ |
| ८ | वरिष्ठ बांधणीकार व कनिष्ठ बांधणीकार | ०१ |
| ९ | वाहन चालक | ०१ |
| १० | दप्तरबंद | ०१ |
| ११ | खलाशी | ०९ |
| १२ | शिपाई | ०५ |
| | **एकूण पदे** | **४२** |

३. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक सी-१, २०२९-जमीन महसूल-१०३ भूमी अभिलेख-(०१) (०३) जिल्हाधिकारी, मुंबई (अनिवार्य) ०१, वेतन (२०२९ ०७५२)" या लेखशिर्षाखाली खर्ची टाकून वित्तीय वर्ष २०२४-२०२५ खालील मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५२०१९४१७५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJAY RAGHUNATH BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2024.03.15 20:31:36 +05'30'

**( संजय बनकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) जिल्हाधिकारी, मुंबई शहर, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई ४००००१.
२) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
५) महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा परीक्षा), मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) वित्त विभाग, कार्यासन व्यय-९/वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१, ल-१, ई-६, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१०) निवड नस्ती, कार्यासन/ई-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.